**मोजमाप पुस्तिकेतील अंकगणितीय चुका तसेच, अनियमिततेमुळे होणारी अतिप्रदाने टाळण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः पंरास -२०१७/प्र.क्र.१८/पंरा-७**

मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: १६ जून, २०१७

**प्रस्तावना :-**

जिल्हा परिषदेअंतर्गत प्रशासकीय व निवासी इमारत बांधकाम करताना हाताळल्या जाणाऱ्या मोजमाप पुस्तिकेत अंकगणितीय चुकांमुळे अतिप्रदाने झाल्याचे शासनाच्या निदर्शनास आले असून, त्याविषयी पंचायत राज समितीनेही नाराजी व्यक्त केली आहे. त्यास अनुसरुन भविष्यात अशा प्रकरणाच्या अनियमितता घडू नयेत याकरीता दक्षता घेणेबाबत सूचित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रकः-**

२. जिल्हा परिषदेअंतर्गत प्रशासकीय व निवासी इमारत बांधकाम करताना मोजमाप पुस्तिकेमध्ये अंकगणितीय चुकांमुळे तसेच, अनियमिततेमुळे होणारी अतिप्रदाने टाळण्याची आवश्यक काळजी व दक्षता जिल्हा परिषदेमधील अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी व कार्यकारी अभियंता (बांध) यांनी घ्यावी. अशी बाब आढळल्यास संबंधीता विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई सुरु करण्यात येईल, याची नोंद घेण्यात यावी.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून सांकेतांक २०१७०६१५१७५४४६५०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2017.06.16 11:59:42 +05'30'

( दि. बा. पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
३) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
४) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद (सर्व)
५) निवडनस्ती पंरा-७